**मानव मुक्ती अल्पसंख्याक वेल्फेअर एज्युकेशन महिला मंडळ, औरंगाबाद संचलीत निवासी मतिमंद विद्यालय, नेवासा फाटा, ता.नेवासा, जि.अहमदनगर ही बंद पडलेली मतिमंद प्रवर्गाची अनुदानीत शाळा अखिल महाराष्ट्र ग्रामीण शिक्षण विकास मंडळ, औरंगाबाद या संस्थेस हस्तांतर करुन नांदी, अंबड, जि.जालना येथे स्थलांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र.एमआयएस २०१६/प्र.क्र.८२/अ.क.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ सप्टेंबर, २०१८ .

**वाचा -** १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इडीडी- २०१३/ प्र.क्र.३५०/अ.क.१, दि.२४.१.२०१४.
२) मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथील रिट याचिका क्र.५७२६/१६ मधील दि.९.६.२०१६ चे न्यायालयाचे आदेश.
३) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक अकआ/प्र-४- मति/रिट क्र.५७२६/ २०१६-१७/२२८२/हस्ता-स्थला, दि.२३.९.२०१६.

**प्रस्तावना :-**

मानव मुक्ती अल्पसंख्याक वेल्फेअर एज्युकेशन महिला मंडळ, औरंगाबाद संचलीत निवासी मतिमंद विद्यालय, मुकुंदनगर, नेवासा फाटा, ता.नेवासा, जि.अहमदनगर ही बंद पडलेली मतिमंद प्रवर्गाची अनुदानीत शाळा अखील महाराष्ट्र ग्रामीण शिक्षण विकास मंडळ, औरगाबाद या संस्थेस हस्तांतरीत करुन मौजे नांदी, अंबड, जि.जालना येथे स्थलांतरीत करण्याबाबत अखिल महाराष्ट्र ग्रामीण शिक्षण विकास मंडळ, औरंगाबाद यांनी मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.५७२६/२०१६ दाखल केली होती. सदरहू रिट याकिचेवर मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी शासन स्तरावर ४ महिन्याच्या आत निर्णय घ्यावा असे दि.९.६.२०१६ रोजी आदेश पारीत केले आहेत. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी आयुक्तालयाकडे प्राप्त झालेले मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना व अहमदनगर यांचेकडील तपासणी अहवाल शासनास सादर केले आहेत. बंद पडलेली मतीमंद प्रवर्गाची अनुदानीत शाळा अखील महाराष्ट्र ग्रामीण शिक्षण विकास मंडळ, औरंगाबाद या संस्थेस हस्तांतर करुन मौजे नांदी, अंबड, जि.जालना येथे स्थलांतरीत करण्याबाबत आयुक्त, अपंग कल्याण, पुणे व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांनी शासनाकडे शिफारशीसह प्रस्ताव पाठविला होता. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने मानव मुक्ती अल्पसंख्याक वेल्फेअर एज्युकेशन महिला मंडळ, औरंगाबाद संचलीत निवासी मतिमंद विद्यालय, मुकुंदनगर, नेवासा फाटा, ता.नेवासा, जि.अहमदनगर ही बंद पडलेली विशेष प्रवर्गाची अनुदानीत शाळा, अखील महाराष्ट्र ग्रामीण शिक्षण विकास मंडळ, औरगाबाद या संस्थेस हस्तांतरीत करुन मौजे नांदी, अबंड, जि.जालना येथे स्थलांतरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**<u>शासन निर्णय</u> :-**

मानव मुक्ती अल्पसंख्याक वेल्फेअर एज्युकेशन महिला मंडळ, औरंगाबाद संचलीत निवासी मतिमंद विद्यालय, मुकुंदनगर, नेवासा फाटा, ता.नेवासा, जि.अहमदनगर ही बंद पडलेली मतिमंद प्रवर्गाची अनुदानीत शाळा अखील महाराष्ट्र ग्रामीण शिक्षण विकास मंडळ, औरगाबाद या संस्थेस हस्तांतरीत करुन मौजे नांदी, अंबड, जि.जालना येथे स्थलांतर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे .

२. सदर संस्थेची मान्य विद्यार्थी संख्या ही ४० निवासी अनुदानित राहील.

३. सदर संस्थेला अपंग/विशेष शाळा मान्यता व अनुदान या योजनेचे अस्तित्वात असलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

४. सदर अपंग निवासी शाळेचे हस्तांतरणचा व स्थलांतरणाचा सर्व खर्च संबंधीत संस्थेला करावा लागेल. त्याची प्रतिपूर्ती देय असणार नाही.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०९१९१६१५३९७२२२ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dnyandev
Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2018.09.19 16:22:03 +05'30'

**( ज्ञा. ल. सुळ )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई ४०००३२.
२) सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहायक, मुंबई ४०००३२.
३) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, औरंगाबाद/नाशिक
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर/जालना.
६) समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर/जालना.
७) महालेखापाल, महाराष्ट्र- २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
८) जिल्हा कोषाधिकारी, अहमदनगर/जालना.
९) अध्यक्ष, अखील महाराष्ट्र ग्रामीण शिक्षण विकास मंडळ, औरगाबाद.
१०) अध्यक्ष, मानव मुक्ती अल्पसंख्याक वेल्फेअर एज्युकेशन महिला मंडळ, औरंगाबाद.
११) निवडनस्ती (अपंग कल्याण-१)

******